**पोषणतत्व गुणसंवर्धित तांदुळ**
(Fortified Rice)
**वितरणासंबंधी भागधारकांची**
**कर्तव्ये आणि जबाबदाऱ्यांबाबत.**

**महराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९**
मंत्रालय विस्तार,मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २४ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,शासन निर्णय क्र:खरेदी-११२४/प्र.क्र.१६०/ना.पु.२९,दि.१४.१०.२०२४.
२) अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,शासन परिपत्रक क्रमांक : धानभ-१३२४/प्र.क्र.१६७/ना.पु.२९,दि.२२.११.२०२४.
३) अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,शासन निर्णय क्र: संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३/ना.पु.२९,दि.१७.१०.२०२२.

**शासन परिपत्रक :-**

फोर्टिफाइड (पोषणतत्व गुणसंवर्धित तांदूळ) तांदूळ वितरण योजना ही केंद्र शासनाची योजना असून अन्न, नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण विभाग TPDS (लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण प्रणाली) मार्फत NFSA कायद्यांतर्गत महाराष्ट्र राज्यात अंत्योदय अन्न योजना, प्राधान्य कुटुंबे आणि वसतिगृहे (आश्रमशाळा) यांना फोर्टिफाइड तांदूळ वितरित करत आहे. किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत विकेंद्रित खरेदी योजना संपूर्ण राज्यात राबविण्याचे संदर्भ क्र.१ शासन निर्णयान्वये निर्देश देण्यात आलेले आहेत.त्याच बरोबर संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये उक्त योजनेअंतर्गत खरेदी करण्यात आलेल्या धानाच्या भरडाईअंती प्राप्त होणाऱ्या सीएमआरचे (तांदळाचे) फोर्टीफिकेशन करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. केंद्र शासनाच्या निर्देशानुसार संपूर्ण राज्यात एप्रिल २०२३ पासून केवळ फोर्टिफाइड तांदूळ वितरीत करण्यात येत आहे.

राज्यात लोकसंख्येतील ॲनेमियाच्या समस्येचे प्रमाण कमी करण्यासाठी फोर्टिफाइड तांदूळ वितरण योजना राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय कुटुंब आरोग्य सर्वेक्षण- ५ च्या आकडेवारीनुसार राज्यात,६-५९ महिने वयाची ६९% बालके ॲनेमियाग्रस्त आहेत हे प्रमाण राष्ट्रीय सरासरी पेक्षा जास्त आहे. तसेच राज्यात ५४% महिला आणि २२% पुरुष ॲनेमियाग्रस्त आहेत.ॲनिमियाच्या आव्हानाला तोंड देण्यासाठी अनेक उपाय राबवले जात आहेत. राज्यात मोठ्या प्रमाणात लोकांकडून तांदळाचे सेवन केले जाते.त्यामुळे हे सिद्ध झाले आहे की, तांदूळासारख्या मुख्य पदार्थाचे फोर्टीफिकेशन करणे ॲनेमियाचे प्रमाण कमी करण्यास जास्त परिणामकारक ठरु शकते.

नॅशनल सॅम्पल सर्व्हे ऑर्गनायझेशन (NSSO) च्या अहवालानुसार,६५% भारतीय तांदूळाचे सेवन करतात.तांदूळ भरडाई आणि पॉलिश करण्याच्या प्रक्रियेत तांदळातील बहुतांश नैसर्गिक पोषक घटक जसे की जीवनसत्व B१२, B६, नियासिन आणि व्हिटॅमिन ई नष्ट होतात. तांदूळ फोर्टिफिकेशन करण्याच्या प्रक्रियेमध्ये मुख्य सूक्ष्म अन्नद्रव्ये परत सामाविष्ट केली जातात.

फोर्टीफाईड राईस म्हणजे भरडलेला तांदूळ आणि Fortified Rice Kernels ( FRK ) १००:१ च्या प्रमाणात मिसळले जातात. FSSAI ने घालून दिलेल्या मानकांनुसार एफआरकेमध्ये लोह, फॉलिक ॲसिड आणि व्हिटॅमिन बी १२ असे सूक्ष्म पोषक घटक असतात.

**फोर्टिफाइड राईस सेवनाचे फायदे पुढीलप्रमाणे आहेत :-**

(a) **लोह -** शरीरात लाल रक्तपेशी आणि हिमोग्लोबिनचे प्रमाण वाढवते त्यामुळे अशक्तपणा कमी करण्यास मदत होते.

(b) **फॉलिक ऍसिड** - नवीन पेशी बनवते आणि गर्भाच्या विकासास मदत करते.

(c) **व्हिटॅमिन B१२** - लाल रक्तपेशींचे प्रमाण वाढवते आणि चेतासंस्थेचे कार्य सामान्यपणे करण्यास मदत करते.

या योजनेचा प्रभाव वाढविण्यासाठी आणि FSSAI ने विहित केलेल्या मानकांमध्ये फोर्टिफाइड तांदळाची गुणवत्ता राखण्यासाठी संपूर्ण पुरवठा साखळीचे निरीक्षण आणि देखभाल करणे आवश्यक आहे.

**१. फोर्टीफाईड तांदूळाच्या वितरणासंबंधी कर्तव्ये व जबाबदाऱ्या:-**

**१.१ सार्वजनिक वितरण प्रणालीमध्ये राईस फोर्टीफिकेशन आणि वितरण खालील टप्प्यांमध्ये केले जाते:-**

१. भात गिरण्यांना धानाचे वितरण.
२. भात गिरण्यांना धानाच्या वितरणानुसार Fortified Rice Kernels (FRK) ची निर्मिती, त्याची साठवणूक आणि भात गिरण्यांना FRK चे नियतन.
३. भातामध्ये Fortified Rice Kernels ( FRK ) मिसळणे.
४. फोर्टीफाईड राईस चे भातगिरणीमध्ये साठवणूक आणि जिल्हा पुरवठा गोदामामध्ये नियतन.
५. जिल्हा पुरवठा आधिकाऱ्याच्या गोदामामध्ये साठवणूक आणि रास्त भाव दुकानांना नियतन.
६. रास्त भाव दुकानांमध्ये साठवणूक आणि लाभार्थ्यांना नियतन.
७. लाभार्थ्यांकडून फोर्टीफाईड राईस शिजवणे,सेवन इ. प्रक्रिया.

**१.२ FoRTrace Portal ( Fortified rice Traceability) :**

फोर्टीफाईड राईस वितरण करण्याच्या संपूर्ण प्रक्रियेचे नियंत्रण, गुणवत्ता चाचणी, तसेच संपूर्ण निर्मिती प्रक्रियेत वापरलेली सामग्री आणि वितरण मार्गाचा मागोवा घेण्यासाठी (traceability) FSSAI द्वारा FoRTrace Portal विकसित करण्यात आले आहे.फोर्टीफाईड राईस तयार करण्याच्या प्रत्येक टप्प्यावर सहभागी असणाऱ्या प्रत्येक भागधारकासाठी (Premix manufacturer/supplier, FRK manufacturer, Rice miller ) FoRTrace Portal अभिप्रेत आहे. FoRTrace Portal संबंधी शासनाकडून वेळोवळी निर्गमित करण्यात येणाऱ्या सूचनांचे सर्व भागधारकांनी पालन करणे बंधनकारक आहे.

**२. भात गिरण्यांना धानाच्या वितरणानुसार Fortified Rice Kernels (FRK) ची निर्मिती, त्याची साठवणूक आणि भात गिरण्यांना FRK चे नियतन :-**

**तक्ता - अ**

| भागधारक | भागधारकांच्या जबाबदाऱ्या |
|---|---|
| १. FRK पुरवठादार | १. करारामध्ये नमूद गुणवत्ता प्रमाणकांमध्ये तंतोतंत जुळत असल्याची खात्री करणे आवश्यक आहे.<br>२. करारामध्ये नमूद वितरणाच्या अटींचे तंतोतंत पालन करणे आवश्यक राहील.<br>३. स्वतंत्र बाह्य NABL (National Accreditation Board for Testing and Calibration Laboraties) मान्यताप्राप्त प्रयोगशाळा प्रमाणपत्र तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे विश्लेषणाचे प्रमाणपत्र (COA Report) असल्याची खात्री करणे. |
| २. जिल्हा पुरवठा अधिकारी<br>३. पुरवठा निरिक्षक<br>४. गोदाम व्यवस्थापक आणि गोदामपाल | १. प्रलंबित खरेदीची खात्री करणे - पुरवठादार FRK चा त्रैमासिक पुरवठा करेल. (उदा. खरीप पणन हंगाम २०२४-२५ साठी जिल्हा ABC ची एकूण आवश्यकता ५०० MTs इतकी आहे. संबंधित जिल्हा पुरवठा अधिकाऱ्याच्या निर्देशानुसार FRK पुरवठादार ६ महिन्यांच्या खरीप हंगामादरम्यान दोन तुकड्यांमध्ये (बॅच) एफआरके तयार करतील आणि पाठवतील.<br>२. FRK ची प्रत्येक तुकडी (बॅच) ही नव्याने निर्माण केलेली असेल आणि नियतन करायच्या आधी तपासणी केली जाईल. जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या नियंत्रणाखालील गोदामामध्ये पाठवयाच्या वेळी कोणतीही FRK बॅच ही ३ महिन्यापेक्षा जास्त जुनी नसेल याची खात्री करणे अनिवार्य असेल.<br>३. FRK चे नियतन करण्यापूर्वी त्याच्या गुणवत्तेची खात्री करणे.<br>४. गोदामामध्ये FRK ची योग्य प्रकारे साठवणूक आणि हाताळणी याची खात्री करणे गरजेचे आहे.<br>५. कागदपत्र आणि रेकॉर्डस् चे जतन करणे.<br>६. विश्लेषणाचा अहवाल (COA Report) भातगिरणी धारकाला पाठवणे. |

## २.१ FRK उत्पादकाची ९कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-

### २.१.१ परवाना आणि प्रमाणपत्रे :

FRK उत्पादककाकडे FSSAI प्रमाणपत्र/परवाना तसेच गुणवत्ता प्रमाणपत्रे असणे आवश्यक आहे.

सदर FSSAI परवाना श्रेणी ९९.५ FSSAI सह पॅनेलमध्ये समाविष्ट आहे.

**a. तयार मिश्रण (Premix) :**

FSSAI च्या मार्गदर्शक सूचनांनुसार जीवनसत्वे (vitamin) आणि खाद्य खनिजे (minerals) चे मिश्रण असेल. (Iron: Micronized ferric pyrophosphate (particle size < ३ microns); Folic Acid - Folic Acid; Vitamin B१२ -Cyanocobalamin or hydroxocobalamin).

सर्व साहित्य सूर्यप्रकाशापासून दूर,थंड,स्वच्छ, कोरडया आणि मोकळी हवा असलेल्या ठिकाणी ठेवावे.

**b. तांदूळ भुकटी ( Rice powder ):**

तांदूळ भुकटी बनवण्यासाठी ११-१२% आर्द्रता असलेल्या व कणांचा आकार ६० mesh किंवा ६० meshपेक्षा जास्त आकार असलेल्या स्वच्छ तुकडा तांदळाचा वापर करावा.

**c. पिण्यास योग्य पाणी:**

वेळोवेळी अद्ययावत सुधारणा केलेल्या IS १०५०० : २०१२ च्या पिण्याच्या पाण्यासाठीच्या भारतीय मानकांचे पालन करण्यात यावे.

d. अन्न सुरक्षा व मानक नियमनांना अनुसरुन तसेच FSSAI ने मान्यता दिलेल्या emulsifiers, acid regulator, antioxidant यांचाच वापर करण्याची परवानगी असेल.

e. फोर्टीफाईड राईस कर्नल (FRK) बनविण्यासाठी FSSAI ने मान्यता दिलेल्या मानक कार्यपद्धती अवलंबणे बंधनकारक असेल.

**f. यंत्रसामग्री:**

BIS ने मान्यता दिलेल्या IS १७८५३:२०२२ मानांकन असलेल्या यंत्रसामग्रीचा वापर करणे अनिवार्य असेल. धान्याची घनता, आकार हा तपशीलवार आदेशानुसारच असेल. FRK चा आकार/रंग हा स्थानिक जातीच्या धानाच्या आकारानुसारच असेल याची खात्री करणे अनिवार्य आहे.

**g. विश्लेषणाचे प्रमाणपत्र (COA Report):**

FRK च्या प्रत्येक बॅचचे, NABL (National Accreditation Board for Testing and Calibration Laboraties) ची मान्यता असलेल्या प्रयोगशाळेकडून लॅब रिपोर्ट वितरणावेळी जमा करण्यात यावे.

h. विश्लेषणाचे प्रमाणपत्र (COA Report) आणि २०० ग्रॅम FRK चे सॅम्पल जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयात जमा करुन, पूर्वनियतन गुणवत्ता पडताळणी मान्यता घेण्यात यावी.

i. जिल्हा पुरवठा गोदामामध्ये FRK चे नियतन विहित कालावधीत करणे बंधनकारक राहील.

j. खरीप पणन हंगाम २०२४-२५ मध्ये जिल्हा पुरवठा अधिकारी आणि संबंधित अधिकारी FRK निर्मितीची गुणवत्ता पाहणी करण्यासाठी क्षेत्रभेट देऊ शकतात.

### २.२ जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या:

१. FRK उत्पादकाला जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाने, महिन्याचे खरेदीचे नियतन करण्यासाठीचे वेळापत्रक द्यावे. वेळापत्रकामध्ये गोदामाचे नाव, नियतन तारीख समन्वय साधणाऱ्या गोदाम व्यवस्थापकाची माहिती असावी.

२. FRK चे नियतन करण्यापूर्वी FRK च्या स्टॉकची पूर्वनियतन तपासणी करणे आवश्यक आहे. यासाठी, FRK उत्पादकांनी जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयात विश्लेषणाच्या अहवालासह (COA Report) २०० ग्रॅम नमुना जमा करून घ्यावेत किंवा जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाने नियुक्ती केलेले अधिकारी क्षेत्रभेट देऊन विश्लेषणाचा अहवाल (COA Report) आणि स्टॉकची तपासणी करू शकतात. जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाकडून पडताळणी आणि मान्यता मिळाल्यानंतरच गोदामात FRK चे नियतन केले जाईल.

३. बॅच क्रमांक सुनिश्चित करण्यासाठी गोदाम व्यवस्थापकांनी डिलिव्हरीच्या वेळी स्टॉकची विश्लेषण अहवालाशी (COA Report) जुळणी करणे बंधनकारक आहे.गोदाम व्यवस्थापकांनी गोदामात उत्पादनाच्या तारखेपासून ३ महिन्यांपेक्षा जुना स्टॉक स्विकारु नये.

४. गोदाम व्यवस्थापकांनी साठवणूक आणि हाताळणीच्या योग्य पद्धतींचे पालन करणे बंधनकारक आहे.(परिशिष्ट १)

### ३. सीएमआरमध्ये ( तांदळामध्ये ) Fortified Rice Kernels ( FRK ) चे ब्लेंडिंग करणे :-

**तक्ता - ब**

| भागधारक | आवश्यकता/जबाबदाऱ्या |
|---|---|
| १.भातगिरणी | a. फोर्टिफाइड राइस कर्नलची (FRKs) हाताळणी, साठवणूक.<br>b. मिश्रण करण्यासाठी योग्य डायनॅमिक ब्लेंडरची उपलब्धता.<br>c. प्रत्येक gunny bag मध्ये १: १०० च्या प्रमाणात CMR सह FRK चे मिश्रण.<br>d. मार्गदर्शक तत्त्वांनुसार फोर्टीफाईड तांदूळाचे लेबलिंग, stencilling आणि पॅकिंग.<br>e. FRK च्या प्रत्येक बॅचसाठी दस्तऐवज आणि FRK चा विश्लेषणाचा अहवाल सोबत ठेवणे.<br>f. Blending efficiency test करून गुणवत्ता खात्री व नियंत्रण राखणे. |
| २. जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय (निरीक्षण अधिकारी/पुरवठा निरिक्षक) | उत्पादनाच्या ठिकाणी यादृच्छिक पद्धतीने गुणवत्ता खात्री व नियंत्रण संचलन करून तांदूळाच्या मिश्रणाच्या गुणवत्तेचे निरीक्षण करणे. सोबत परवाने, प्रमाणपत्रे आणि रेकॉर्डचे दस्तऐवज अद्ययावत आहेत याची खात्री करणे. भात गिरणी धारकांची फोर्टिफाइड तांदूळ उत्पादनाची गुणवत्ता सुनिश्चित करण्यासाठी क्षमता बांधणी करणे. |

### ३.१ भातगिरणी धारकांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या:

३.१.१ **योग्य परवाने आणि प्रमाणपत्रे:-**

a. ६.१ श्रेणी अंतर्गत वैध FSSAI परवाना. (भात भरडाई)
b. FSSAI कडून +F (endorsement) समर्थन प्रमाणपत्र.
c. डायनॅमिक मिश्रणाचे BIS प्रमाणपत्र.

३.१.२ **<u>ब्लेंडिगसाठी योग्य उपकरणे:-</u>**

योग्य ब्लेंडिंग मशीन तपासताना, खालील बाबींची खात्री करणे आवश्यक आहे:

a. Gunny bag च्या पॅकेजिंगच्या आधी ब्लेंडर ठेवले गेले आहे का ?
b. ब्लेंडरमध्ये प्रत्येक गोणीचे १:१०० गुणोत्तर सुनिश्चित करण्याची क्षमता आहे ?
c. ब्लेंडरमध्ये खालील ३ वेगवेगळे भाग आहेत का ? (i) लोड सेल-आधारित सेन्सर, (ii) ब्लेंडिंग युनिट, (iii) मिश्रित फोर्टिफाइड तांदळाचे स्वयंचलित वितरण.

३.१.३. **<u>लेबलिंग, stencilling आणि पॅकिंग:-</u>**

a. फोर्टिफाइड तांदळासाठी वापरल्या जाणाऱ्या सर्व गोण्यांवर +F निळा लोगो स्टेन्सिल केलेला असणे बंधनकारक आहे.
b. लेबलसाठी टेम्पलेट लेबल, रेक्सिन स्लिप्सवर छापण्यासाठी वापरावा. (परिशिष्ट ७)
c. रेक्सिन लेबलसह Gunny bag पॅकिंग सुनिश्चित करण्यासाठी दुहेरी शिलाई पद्धतीचा वापर करावा.

३.१.४. गोदामातून प्राप्त झालेल्या FRK च्या प्रत्येक बॅचसाठी विश्लेषणाच्या प्रमाणपत्राच्या पावतीची खात्री करावी आणि अहवालाच्या बॅच क्रमांकासह स्टॉकची तपासणी करावी.

३.१.५. फोर्टिफाइड तांदूळाची नियमितपणे दर तासाला मिश्रण क्षमता चाचणी करुन गुणवत्ता राखली गेली आहे का याची खात्री करुन त्याची नोंद ठेवावी.

३.१.६. प्रमाणित दस्तऐवजीकरण आणि रेकॉर्ड ठेवणे बंधनकारक आहे. (परिशिष्ट ३)

३.१.७. एफआरके आणि फोर्टिफाइड तांदूळ यांचे नमुने भातगिरणीमध्ये राखून ठेवावे.

## ३.२ जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या:

३.२.१. उत्पादन कालावधी दरम्यान भात गिरण्यांची नियमित याद्दच्छिक तपासणी करावी.

३.२.२. ५०ग्रॅम फोर्टीफाईड तांदुळाच्या नमुन्यावर भात गिरणीतील स्टॉकची Blending कार्यक्षमता चाचणी वापरून गुणवत्ता तपासावी.

३.२.३. परवाने, प्रमाणपत्रे तपासणे आणि कागदपत्रे आणि रेकॉर्ड योग्यरित्या अद्ययावत असल्याची खात्री करावी.

३.२.४. FRK आणि फोर्टीफाईड तांदूळ साठवण पद्धतींचे प्रत्यक्ष पडताळणी करावी.

३.२.५. फोर्टीफाईड तांदूळाची गुणवत्तेची खात्री करण्यासाठी धानगिरणी धारकांची बांधणी करावी.

## ४. फोर्टीफाईड तांदूळाचे नियतन व साठवणूक :

**तक्ता - क**

| भागधारक | जबाबदाऱ्या |
|---|---|
| १. भात गिरणीधारक | भात गिरणीमध्ये योग्यरित्या फोर्टीफाईड तांदूळाची साठवणूक. |
| २. जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय -<br>गोदाम व्यवस्थापक/ पालक आणि पुरवठा निरीक्षक आणि निरीक्षण अधिकारी | a. गोदामामध्ये फोर्टीफाईड तांदूळाची योग्यरित्या साठवणूक.<br>b. साठवणूकीच्या मानक कार्यपद्धतीनुसार निरीक्षण करणे. |
| ३. रास्त भावाचे धान्य दुकान मालक | रास्त भावाचे धान्य दुकानामध्ये फोर्टीफाईड तांदूळाची योग्यरित्या साठवणूक. |

### ४.१ धानगिरणीधारकांची भूमिका:

४.१.१ परिशिष्ट क्र.१ मध्ये नमूद केलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार फोर्टिफाइड तांदळाची साठवण करणे.

४.१.२ कीटक, उंदीर यांच्यामुळे होणारी हानी टाळण्यासाठी कीड व्यवस्थापन करणे.

४.१.३ फोर्टीफाईड तांदळाची नियतन केल्याची नोंद संबंधित पावतीचा रेकॉर्ड ठेवणे.

### ४.२ जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाची भूमिका:

४.२.१ फोर्टिफाइड तांदूळाची गुणवत्ता, संमिश्र कार्यक्षमता चाचणी वापरून, परिशिष्ट ५ मधील मानकांची पूर्तता करत असल्याची खात्री करुनच स्वीकारण्यात यावा. फोर्टिफाइड तांदूळाची गुणवत्ता चाचणी यादृच्छिक पद्धतीने राईस मिल मधून वितरण होण्याआधी तसेच गोदामामध्ये स्वीकारण्यापूर्वी करण्यात यावी.

४.२.२ अयोग्य पद्धतीने तांदूळ मिश्रित केलेले आढळल्यास ते स्वीकारण्यात येऊ नयेत तसेच राईस मिलर्सद्वारे पुन्हा मिश्रण सुनिश्चिती करणे आवश्यक आहे.

४.२.३ भात गिरणी, गोदाम आणि रास्त भाव दुकानातील साठवणुकीच्या पद्धतींची प्रत्यक्ष जाऊन नियमित तपासणी करणे.

४.२.४ गोदामात आलेल्या फोर्टिफाइड तांदळाच्या प्रत्येक लॉटबाबत संपूर्ण कागदपत्रे जपून ठेवण्याची जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाची असेल. महत्वाचे दस्तऐवज जसे की,

a. राईस मिलर्सचा FSSAI परवाना.
b. +F समर्थन प्रमाणपत्र.
c. डायनॅमिक ब्लेंडरसाठी बीआयएस प्रमाणपत्र.
d. खरेदी केलेल्या FRK साठी Invoice .

e. मिश्रित करण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या FRK साठी विश्लेषणाचे प्रमाणपत्र.
f. उत्पादनादरम्यान तांदूळ गिरणीमध्ये Blending efficiency test च्या नोंदी ठेवणे.
g. धान गिरणीधारकाने पुरवठा केलेल्या आणि वापरलेल्या FRK च्या बॅच-निहाय नोंदी.

**४.३ रास्त भावाचे धान्य दुकान मालकांची भूमिका :**

४.३.१ फोर्टिफाइड तांदूळाचे दुकानात नियतन झाल्यानंतर फोर्टिफाइड तांदूळाची साठवण शिफारस केलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार करावी. (परिशिष्ट १)

४.३.२ रास्त भावाच्या धान्य दुकानात वितरण करण्यात येणाऱ्या फोर्टिफाइड तांदुळाचा नमुना ठेवण्यात यावा.

४.३.३ कीटक किंवा उंदीर द्वारे नुकसान टाळण्यासाठी कीटक व्यवस्थापन सुनिश्चित करणे.

४.३.४ फोर्टीफाईड राईससंबंधी संपूर्ण माहिती दर्शवणारे होर्डींग/बॅनर दुकानाच्या दर्शनी भागात लावणे. ( IEC डिस्प्ले).

४.३.५ वितरण करण्यात येत असलेल्या फोर्टिफाइड तांदळाची मासिक माहिती सत्रे आयोजित करावी.

**५. रास्त भाव दुकानांमधून लाभार्थ्यांना नियतन आणि लाभार्थ्यांकडून फोर्टीफाईड राईसची हाताळणी, शिजवणे,खाणे इ. प्रक्रिया.**

**तक्ता – ड**

| भागधारक | भागधारकांच्या जबाबदाऱ्या |
|---|---|
| १. जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय | a. इतर विभागांच्या सहकार्याने फोर्टिफाइड तांदूळ वाटप करणे आणि फोर्टिफाइड तांदुळावर जनजागृती मोहीम राबवणे.<br>b. साठवणुकीबाबत रास्त भावाचे धान्य दुकानदारांची क्षमता वाढवणे, फोर्टिफाइड तांदूळ हाताळणे आणि फोर्टिफाइड तांदूळाबाबत जनजागृती करण्यामध्ये त्यांची भूमिका सुनिश्चित करणे. |
| २. रास्त भावाचे धान्य दुकान मालक | a. फोर्टिफाइड तांदूळ साठवण आणि हाताळणी.<br>b. रास्त भावाच्या धान्य दुकानाशी संबंधित सर्व लाभार्थ्यांमध्ये जागरूकता निर्माण करणे. |
| ३. लाभार्थी | फोर्टिफाइड तांदूळ योग्य प्रकारे शिजवणे आणि खाणे. |

**५.१ जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाची भूमिका:**

५.१.१ रास्त भावाचे धान्य दुकाने, अंगणवाड्या, आरोग्य केंद्रे, पंचायत समिती इत्यादी प्रमुख ठिकाणी पोस्टर्स/होर्डिंग्ज/बॅनर/भिंती चित्रांचे प्रदर्शन करून संपूर्ण जिल्ह्यात फोर्टिफाइड तांदुळाच्या जनजागृतीसाठी माहिती, शिक्षण आणि संवाद साधणे.

५.१.२ जिल्हा आणि ब्लॉक स्तरावरील इतर विभागांसोबत सहयोग आणि फोर्टिफाइड तांदूळ देखील वितरीत केले जातात, अशा PM Poshan आणि ICDS योजनांसह सामुदायिक संलग्नता उपक्रम राबवणे.

५.१.३ तांदळाच्या सर्व पोत्यांवर +F लोगोचा डिस्प्ले आणि वापर पुरवठा साखळीमध्ये राखून ठेवला जाईल आणि वाहतूक करताना गमावला जाणार नाही, याची खात्री करणे. लेबल/स्टिकर रास्त भाव दुकानापर्यंत व शेवटच्या लाभार्थीपर्यंत पोहोच होईल याची खात्री करणे.

५.१.४ फोर्टिफाइड राईसवर प्रमाणित पोस्टर्स आणि व्हिडिओ वापरून जागरूकता निर्माण करण्यासाठी सोशल मीडियाचा वापर करणे.

५.१.५ अग्रगण्य वर्तमानपत्रे, रेडिओ आणि इतर मुद्रित आणि दूरदर्शन माध्यमांमधील लेखांचा वापर करणे.

**५.२ रास्त भावाचे धान्य दुकान मालकांची भूमिका:**

५.२.१ फोर्टिफाइड तांदळाच्या फायद्यांचा प्रसार, अशक्तपणाचा सामना करण्यासाठी त्याचे महत्व आणि प्लास्टिकच्या तांदळाच्या अफवांविषयी गैरसमज दूर करणे.

५.२.२ फोर्टिफाइड तांदूळ शिजवण्यासाठी जलरोधक(Water tight method) पद्धत वापरावी आणि फोर्टिफाइड तांदूळाच्या नियमित वापरास प्रोत्साहन देणे.

**५.३ लाभार्थ्यांची भूमिका:**

५.३.१ जलरोधक पद्धतीने फोर्टिफाइड तांदूळ शिजवणे.

५.३.२ तांदूळ साफ करताना किंवा धुताना कर्नल काढले जाणार नाहीत याची खात्री करणे.

५.३.३ फोर्टिफाइड तांदूळ आणि त्याचे फायदे इतर लाभार्थ्यांपर्यंत पोहोचवणे.

६. फोर्टिफाइड (पोषणतत्व गुणसंवर्धित तांदूळ) तांदूळ वितरण योजनेची अंमलबजावणी करताना सर्व संबंधित भागधारकांनी सदर शासन परिपत्रकामधील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

७. उक्त शासन परिपत्रक,महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१८५३४२४४०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2025.03.24 18:55:13 +05'30'

( राजश्री सारंग )

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

सहपत्र :- **परिशिष्ट I, II, III, IV, V, VI, VII.**

**प्रति,**

१. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कनमुर हाऊस, मुंबई.

२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक
३. जिल्हाधिकारी, सर्व.
४. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी,सर्व.
६. सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी,सर्व.
७. जनरल मॅनेजर (महाराष्ट्र) ,भारतीय अन्न महामंडळ, बोरीवली (पूर्व), मुंबई.
८. उपआयुक्त (पुरवठा), सर्व विभाग.
९. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री , अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,यांचे सचिव.
४. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे सचिव.
५. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद
६. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
७. अपर मुख्य सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
११.खाजगी सचिव, मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण), मंत्रालय, मुंबई-३२.
१२.मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती),
१३.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई. (१० प्रती)

**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि २४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.**

## परिशिष्ट -१ फोर्टिफाइड राईस कर्नेल आणि फोर्टिफाइड तांदूळाची साठवणूक आणि हाताळणी.

१. फोर्टिफाइड तांदूळ साठवण्यासाठी स्वतंत्र सीमांकित क्षेत्र नियुक्त करावे.
२. सूर्यप्रकाशापासून दूर स्वच्छ, कोरड्या जागी साठवणूक करावी.
३. तांदळाच्या पिशव्या सर्व भिंती आणि छतापासून दूर ठेवा जेणेकरून हवेचा मुक्त संचार प्रवेश मिळेल.
४. पिशव्यांद्वारे ओलावा शोषला जाऊ नये म्हणून थेट जमिनीवर पिशव्या ठेवू नका. मजल्याशी थेट संपर्क टाळण्यासाठी पॅलेटसारख्या ओलावा प्रतिरोधक उंचावलेल्या प्लॅटफॉर्मवर ठेवा. पॅलेट्स उपलब्ध नसल्यास, स्वच्छ पॉलिथिन/टारपॉलीन शीटवर स्टोरेज केले जाऊ शकते.
५. पिशव्या विटांच्या थराच्या नमुन्यात स्टॅक करा.
६. तांदळाच्या पिशव्या ज्या ठिकाणी ठेवल्या आहेत तेथे कोणतेही साफसफाईचे उपाय, रसायने, कीटकनाशके, रॉकेल, वंगण तेल किंवा पाणी साठवू नये.
७. वापर केल्यानंतर तांदळाची पिशवी व्यवस्थित बांधून मेटल स्टोरेज बिनमध्ये साठवून ठेवावी. तांदूळ मेटल स्टोरेज बिनच्या संपर्कात थेट ठेवू नयेत, आवश्यक असल्यास, तांदूळाच्या रिकाम्या पिशव्याचा वापर स्टोरेज बिनमध्ये तांदूळ डिकँट करण्यापूर्वी स्टोरेज बिनच्या आतील पृष्ठभागावर रेषा करण्यासाठी केला पाहिजे.
८. गंजलेले आणि/किंवा घाणेरडे कंटेनर मोजण्यासाठी वापरू नका. समर्पित, स्वच्छ, कोरडे स्टेनलेस स्टील किंवा प्लास्टिक कंटेनर वापरा. वापरल्यानंतर, ते स्वच्छ आणि कोरड्या जागी ठेवा आणि तांदळाच्या पिशवीत ठेवू नका.
९. FIFO च्या तत्त्वाचे अनुसरण करा (फर्स्ट इन फर्स्ट आउट). प्रथम प्राप्त झालेल्या तांदळाच्या पिशव्या मध्यान्ह भोजन तयार करण्यासाठी प्रथम वापरल्या जातात. नवीन स्टॉक आल्यास, स्टोअरमध्ये आधीच उपलब्ध असलेल्या स्टॉकच्या वर नवीन वाटप लोड केलेले नाही याची खात्री करा.
१०. फोर्टिफाइड तांदळाच्या वापराची नोंद ठेवा आणि ती नेहमी अदययावत ठेवा.

**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि २४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.**

## परिशिष्ट २ - डायनॅमिक ब्लेंडर

BIS मानक IS १७८५४* नुसार उपकरणे स्टेनलेस स्टीलची असावीत.

हॉपर, झाकण, पॅडल, कंटेनर, ॲजिटेटर तयार करण्यासाठी वापरलेले स्टेनलेस स्टील हे IS ६९११ नुसार ISI-चिन्हांकित असेल याची उत्पादकाने खात्री करावी आणि स्क्रू/रिबनच्या निर्मितीसाठी वापरलेले स्टेनलेस स्टील IS ७२८३ नुसार ISI-चिन्हांकित असेल.

उत्पादनकर्ता चाचणी उपकरणांसाठी कॅलिब्रेशन योजना तयार करेल आणि त्याची अंमलबजावणी करेल.

एकूण ब्लेंडिग मशीन मध्ये ३ भाग असणे आवश्यक आहेत -

१. स्वयंचलित वजन फीडरसाठी लोड सेल-आधारित पॅनेलसह स्टेनलेस स्टील फीडर.

२. प्रत्येक गोणीमध्ये तांदूळ आणि FRK स्वतंत्रपणे मिसळण्यासाठी Individual blending unit असेल.

३. मिश्रित फोर्टिफाइड तांदळाचे स्वयंचलित आउटपुट/वितरण.



**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि २४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.**

## परिशिष्ट ३ - राईस मिलमध्ये आवश्यक असलेली कागदपत्रे आणि रेकॉर्ड

**१. धानाची नोंद** -

a. तारीख.
b. एकूण प्राप्त झालेले धान.
c. फोर्टिफाइड तांदळाची एकूण प्राप्त ऑर्डर.
d. भरडलेला तांदूळ जिल्हा पुरवठा अधिकारी_गोदामात जमा केला.
e. जमा करावयाची शिल्लक.

**२. एफआरकेची नोंद-**

a. तारीख.
b. FRK जमा परिमाण.
c. FRK वापर.
d. FRK चा शिल्लक साठा.

**३. फोर्टिफाइड तांदूळ उत्पादन रजिस्टर तारीख -**

a. फोर्टिफाइड तांदूळ उत्पादित. (MT)
b. फोर्टिफाइड तांदळाचा लॉट नंबर.
c. वापरलेले फोर्टिफाइड राइस कर्नल. (MT)
d. वापरलेल्या FRK चा बॅच नंबर.

**४.मिलमध्ये गुणवत्ता नियंत्रण आणि खात्री ( Blending Efficiency Test) BET-**

a. तारीख.
b. वेळ.
c. फोर्टिफाइड तांदुळाचा लॉट नंबर.
d. फोर्टिफाइड तांदळाच्या नमुन्याचे वजन.
e. नमुन्यातील FRK ची संख्या.
f. नमुन्यातील FRK चे वजन (Gms).

**५. प्राप्त झालेल्या सर्व FRK स्टॉकच्या प्रयोगशाळेच्या अहवालांसह विश्लेषण अहवाल .**

**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि२४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.**

## परिशिष्ट ४ - Blending Efficiency Test ( BET ) वापरून फोर्टिफाइड तांदळाच्या गुणवत्तेची हमी व नियंत्रण.

नमुना प्रक्रिया: ब्लेंडरच्या डिस्चार्जच्या टोकापासून ५० ग्रॅम नमुना गोळा केला जाईल.

संदर्भ नमुना: लहान भांड्यात प्रति बॅच ५ ग्रॅम नमुना ठेवून दिवसाच्या उत्पादनाचा संमिश्र नमुना ठेवा.

चाचणी प्रक्रिया: खालीलप्रमाणे:

- Blending Efficiency Test :

फोर्टिफाइड तांदूळ नमुन्यासाठी स्वच्छ, कोरडा आणि गंज नसलेला कंटेनर वापरावा.

- एका वाटीत ५० ग्रॅम फोर्टिफाइड मिश्रित तांदूळाचे वजन करावे.
- कच्चा तांदूळ आणि फोर्टिफाइड तांदूळ योग्य प्रकारे प्रकाशित ठिकाणी हाताने उचलून वेगळे करावेत.
- फोर्टिफाइड राईस कर्नल मोजून त्याची नोंद करावी.
- प्रशिक्षित कर्मचाऱ्यांद्वारे एफआरकेचे योग्य पृथक्करण करण्यासाठी चाचणी चांगल्या प्रकाशित भागात केली जाईल.

| FRK च्या नोंदी /TEMPLATE OF RECORD | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | तारीख | वेळ | बॅच नंबर | नमुन्याचे वजन(५० ग्रॅ.) | FRKचे वजन (ग्रॅममध्ये) | FRK संख्या (In number) |
| | | | | | | |
| | | | | | | |

शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि २४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.

परिशिष्ट ५- पोषणतत्व गुणसंवर्धित तांदळाचा तपशील (Schedule of Specification of Fortified Rice)

| अ.क्र. | वर्गीकरण | एकूण तांदळाच्या कमाल मर्यादेच्या प्रमाणात (common rice) टक्केवारी. |
|---|---|---|
| १. | तुटलेले तांदूळ | २.५ % |
| २. | अन्य बाबी | ०.५ % |
| ३. | खराब झालेले/किंचित नुकसान झालेले तांदूळ | ३.० % |
| ४. | रंगहीन तांदूळ | ३.० % |
| ५. | खडूसारखे तांदूळ | ५.० % |
| ६. | लाल तांदूळ | ३.० % |
| ७. | खालच्या वर्गाचे मिश्रण | - |
| ८. | DE husked तांदूळ | १३.०० % |
| ९. | ओलावा सामग्री | १४.०० % |
| १०. | फोर्टीफाईड राईस कर्नल | १% w/w |

**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि २४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.**

## परिशिष्ट ६ : + F Endorsement प्रमाणपत्र प्रक्रिया.

फोर्टिफाइड फूड प्रोडक्ट्ससाठी +F एंडोर्समेंट प्रमाणपत्रासाठी अर्ज करण्यासाठी, फूड बिझनेस ऑपरेटर्स (FBOs) यांनी खालील प्रक्रीया करणे आवश्यक आहे:

१. पोर्टलवर लॉग इन करा.

२. परवाना/नोंदणी वर नेव्हिगेट करा.

३. फोर्टिफाइड उत्पादनांचे समर्थन करा क्लिक करा.

४. ड्रॉप-डाउन मेनूमधून अर्ज प्रकार निवडा.

५. ज्या अर्जासाठी एंडोर्समेंट आवश्यक आहे त्याच्या समोरील Proceed वर क्लिक करा.

६. घोषणा वाचा, उत्पादन चाचणी अहवाल अपलोड करा आणि मी सहमत आहे या पर्यायावर क्लिक करा.

७.एंडोर्समेंटसाठी उत्पादन निवडा, ब्रँड नाव आणि रूपे अद्ययावत करा आणि माहिती सबमिट करा.

८.FSSAI +F एंडोर्समेंट प्रमाणपत्र तयार करेल आणि फूड बिझनेस ऑपरेटर्स ते डाउनलोड करू शकतात.

https://fssai.gov.in/upload/advisories/२०१८/०८/५b७f८२ea४४d०५Order__Endorsement__Fortification__Logo__२१__०८__२०१८.pdf

**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण-२६२१/प्र.क्र.३०३(भाग-२)/ना.पु.२९, दि २४.०३.२०२५ सोबतचे सहपत्र.**
**परिशिष्ट ७ - Gunny Bagसाठी वापरल्या जाणाऱ्या +F लेबलचे मानक टेम्पलेट.**

१२ सप्टेंबर २०२४ रोजी पत्र क्रमांक २६२२/१५४/नापु २९ द्वारे जारी केले. शिफारस केलेले आकार: न फाटता येण्याजोग्या वॉटरप्रूफ रेक्सिनमध्ये मानक A५ (१४.८ सेमी बाय २१ सेमी)

FORTIFIED
SAMPOORNA POSHAN SWASTH JEEVAN

FORTIFIED RICE
**फोर्टिफाइड तांदूळ**
**महाराष्ट्र**
Fortified with Iron, Folic acid and Vitamin B१२ micronutrients.

KMS २०२४-२५

**STORAGE (स्टोरेज प्रक्रिया)**

Keep unopened bags of fortified rice in cool dry place, away from direct sunlight. Once opened, re-store by tying a string around the neck of bag tightly.

(फोर्टिफाइड तांदुळाच्या गोणीला सूर्यप्रकाशापासून दूर, थंड आणि कोरड्या जागी ठेवावी. तसेच फोर्टिफाइड तांदुळाची गोणी, एकदा उघडली की, पुढील वापरापर्यंत गोणीला गाठ मारून ठेवावी)

**COOKING DIRECTION (भात शिजवण्याची पद्धत)**

Clean and wash २-३ times like regular rice. Do not separate out the fortified rice kernels (FRKs). Use pressure cooking or lid-closed utensil. If rice is soaked in water, prior to cooking, please use the same water for cooking.

(फोर्टिफाइड तांदुळाला साधारण तांदळाप्रमाणे २-३ वेळा स्वच्छ धुवा. फोर्टीफाईड राईस कर्नल (FRK) वेगळे करू नका. भात शिजविण्यासाठी जास्त पाणी वापरू नका. प्रेशर कुकर किंवा झाकण बंद भांड्याचा वापर करा. भात शिजविण्यापूर्वी फोर्टिफाइड तांदुळ पाण्यात भिजत ठेवला असेल तर त्याच पाण्यामध्ये भात शिजवा)

**Ingredients (साहित्य):** Custom milled rice mixed with Fortified rice kernels in the ratio of १:१०० (१:१०० च्या प्रमाणात तांदुळात मिसळले ले फोर्टिफाइड राईस कर्नल)

**प्रत्येक १०० ग्रॅम फोर्टिफाइड तांदूळ मध्ये हे समाविष्ट आहे** (Each १००g of fortified rice contains)

Iron (लोह): २.८ - ४.२५ gram
Folic Acid (फॉलिक ॲसिड): ७.५ - १२.५ mcg
Vitamin B१२ (व्हिटॅमिन बी१२): ०.०७५- ०.१२५ mcg

Net Weight (निव्वळ वजन): ५० Kg

Batch Number :
बॅच क्र

Manufacture Date:
उत्पादन तारीख

| | |
|---|---|
| **Health Claim (आरोग्य दावे):** Iron fights anaemia. Folic acid is important for foetal development, and Vitamin B१२ is good for nervous system (लोह तत्व अनेमिया कमी करण्यात मदत करते, फॉलिक ऍसिड गर्भाच्या विकासासाठी महत्वाचे आहे आणि व्हिटॅमिन बी १२ चेतासंस्थेसाठी चांगले आहे) | Commodity : Raw rice (common)<br><br>Mill Code:<br><br>Agreement Number:<br><br>Lot Number:<br><br>Consignment number:<br><br>Fortified rice is meant for supply under PDS Maharashtra only. (NOT FOR SALE IN OPEN MARKET)<br><br>लोह, फोलिक ॲसिड आणि व्हिटॅमिन बी-१२ या सूक्ष्म पोषक घटकांचा समावेश. फोर्टीफाईड तांदुळ फक्त महाराष्ट्र राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत पुरवठ्यासाठी आहे. (खुल्या बाजारात विक्रीसाठी नाही.) |

License Number :
Contact :

fssai

**मिलचे नाव आणि पत्ता**
**<जिल्ह्याचे नाव >**